राज्यातील नवनिर्मित १२ ट्रामा केअर युनिटकरिता यंत्रसामग्री खरेदी करण्यास पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करण्यात आलेली तरतूद खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरवणी-२०१८/प्र.क्र. २३८/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: ०६ फेब्रुवारी, २०१९.

**संदर्भ-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-३/निविदा प्रक्रिया/जिरु/ट्राकेयु/१८-१९/४५९५/१८, दि.४/१२/२०१८.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः प्रशामा-२०१८/प्र.क्र.१६४/आरोग्य-८, दि. २४.७.२०१८.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः पुरवणी-२०१८/प्र.क्र.२३८/आरोग्य-८, दि. १६.०१.२०१९.
४)शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

**प्रस्तावना -**

राज्यातील नवनिर्मित १२ ट्रामा केअर युनिटकरिता रुग्णालयीन यंत्रसामग्री खरेदी करण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतूद रु.३.०० कोटी व हिवाळी अधिवेशन, २०१८ मध्ये रु.१२,१८,७७,१४८/- इतका निधी लेखाशिर्ष ४२१० ११७३ अंतर्गत ५२-यंत्रसामुग्री व साधनसामग्री खरेदीसाठी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला असून एकूण रु. १५,१८,७७,०००/- निधी वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यापैकी शासन निर्णय दि.२४.७.२०१८ व दि.१६.०१.२०१९ अन्वये १२ ट्रामा केअर युनिटकरिता रुग्णालयीन यंत्रसामग्री खरेदी करण्यास अनुक्रमे रु.२,१०,००,०००/- व रु.८,५३,१४,००३/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली असून उर्वरित रु.४,५५,६२,९९७/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय-

राज्यातील नवनिर्मित १२ ट्रामा केअर युनिटकरिता रुग्णालयीन सामुग्री खरेदी करण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात हिवाळी अधिवेशन, २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या निधीपैकी रु.४,५५,६२,९९७/- (रु.चार कोटी पंचावन्न लाख बासष्ट हजार नऊशे सत्त्याण्णव फक्त) इतका निधी खर्च करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरहू यंत्रसामग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.
२) सदर यंत्रसामग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.
३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.
४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.
५) सदर खरेदीवर होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात हिवाळी अधिवेशन, २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

४२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६- सार्वजनिक आरोग्य, ०१-संचालन व प्रशासन
(०१)(०३)- ट्रामा केअर युनिटची स्थापना- महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा
५२- यंत्रसामग्री व साधनसामग्री (४२१० ११७३)

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management ) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

९) तसेच सदर यंत्रसामग्रीच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

१०) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

११) संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-

पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०७१५१९१५८११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2019.02.08 11:46:14 +05'30'

**( ज.स.तडवी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
२) मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांचे खाजगी सचिव
३) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई
५) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१३) वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई
१४) निवडनस्ती (आरोग्य-८)